कृषी उन्नती योजनेंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियान अंतर्गत लघुअभियान -१ ( तेलबिया ) व लघुअभियान -३ ( वृक्ष आधारित तेलबिया) साठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये पहिल्या हप्त्याचा निधी वितरित करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** रागते-१२१५/ प्र.क्र.१२५/४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२

तारीख: १९ ऑगस्ट, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः रागते-१२१४/प्र.क्र.३१/४अे, दि. ०४ एप्रिल, २०१४,

२) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-१/२०१५-सीए-॥ ,दि.१५ एप्रिल, २०१५

३) केंद्र शासनाचे पत्र क्र. ६-१३/२०१५-AAP (Coord) /OS , दि.१५ मे, २०१५

४) शासन निर्णय क्रमांक:- रागते-१२१५/प्र.क्र.१२५/४अे, दि. ०५ जून, २०१५

५) केंद्र शासनाचे पत्र क्र. १४-१/२०१५-सीए-॥ ,दि.०१ जून, २०१५ (तीन पत्रे)

६) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि. १७ एप्रिल, २०१५

७) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृआ./वि.प्र.-२/NMOOP १५-१६/प्र.वि.मा./२१६/१५, दि. १६ जून,२०१५

**प्रस्तावना**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय गळीत धान्य उत्पादन कार्यक्रम, राष्ट्रीय कडधान्य विकास कार्यक्रम व गतीमान मका विकास कार्यक्रम राज्यात सन २०१३-१४ पर्यंत राबविण्यात येत होता. केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सर्व केंद्र पुरस्कृत योजनांची पुनर्रचना केली आहे. त्यानुसार केंद्र पुरस्कृत एकात्मिक गळीतधान्य, कडधान्य, तेलताड व मका विकास कार्यक्रमाऐवजी राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm) या अभियानाची सुरवात केली आहे. सदर अभियानाअंतर्गत लघुअभियान- १ ( तेलबिया ), लघुअभियान-२ (तेलताड) व लघुअभियान-३ ( वृक्षआधारित तेलबिया) या तीन लघुअभियानांचा समावेश असणार आहे. या अभियानाच्या निधीत सन २०१४-१५ पर्यंत केंद्र व राज्य हिश्याचे प्रमाण ७५:२५ असे होते. सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने सदर अभियानाअंतर्गत केंद्र व राज्य हिश्याच्या प्रमाणात ५०:५० असा बदल केला आहे.

सन २०१५-१६ मध्ये सदर अभियान तेलबिया व वृक्षआधारित तेलबिया या दोन घटकांसाठीच राबविण्यास केंद्र शासनाने मंजूरी दिली आहे.

केंद्र शासनाने राष्ट्रीय तेलबिया व तेलताड ( National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)) या अभियानाचा सन २०१५-१६ पासून कृषी उन्नती योजनेंतर्गत अंतर्भाव केला आहे. सदर अभियान राज्यात सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी ₹ ४८६९.६६ लक्ष निधीच्या कार्यक्रमास दि. ०५ जून, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी दिली आहे. सदर निधीमध्ये केंद्र हिस्सा ₹ २४३४.८४ लक्ष व राज्य हिस्सा ₹ २४३४.८२ लक्ष असा असणार आहे. केंद्रिय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधीन अ.क्र.५ च्या पत्रांन्वये सदर अभियानाअंतर्गत केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी ₹ १२१७.४१ लक्ष निधी वितरित केला आहे. सदर निधीपैकी ₹ १२४.१८ लक्ष अनुसूचित जाती, ₹१०८.३५ लक्ष अनुसूचित जमाती व ₹९८४.८८ लक्ष निधी सर्वसाधारण घटकासाठी आहे. त्यानुसार सदर अभियानाअंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरीत केलेल्या ₹ १२१७.४१ लक्ष (अक्षरी रूपये बारा कोटी सतरा लक्ष एक्केचाळीस हजार फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यासाठी शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय

१) केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेअंतर्गत राष्ट्रीय तेलबिया व तेलताड (National Mission on Oilseed and Oil Palm (NMOOP)) या अभियानाअंतर्गत लघुअभियान-१ (तेलबिया) व लघुअभियान- ३ ( वृक्षआधारित तेलबिया ) राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या ₹ १२१७.४१ लक्ष (अक्षरी रूपये बारा कोटी सतरा लक्ष एक्केचाळीस हजार फक्त ) निधीच्या कार्यक्रमास या आदेशान्वये शासनाची वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२). केंद्र शासनाने पहिल्या हप्त्यापोटी वितरित केलेल्या ₹१२१७.४१ लक्ष निधीचे लघु अभियाननिहाय व प्रवर्गनिहाय वितरण पुढीलप्रमाणे राहील:-

(रूपये लक्ष मध्ये)

| अ. क्र. | उपअभियानाचे नाव | सर्वसाधारण घटक | अनुसूचित जाती | अनुसूचित जमाती | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | लघुअभियान-१ ( तेलबिया ) | ९७२.४५ | १२२.६१ | १०६.९८ | १२०२.०४ |
| २ | लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) | १२.४३ | १.५७ | १.३७ | १५.३७ |
| | एकूण | ९८४.८८ | १२४.१८ | १०८.३५ | १२१७.४१ |

३) केंद्र शासनाने पहिल्या हप्त्यापोटी वितरित केलेला ₹ १२१७.४१ लक्ष निधीचा खर्च, सन २०१५-१६ करिता खालील लेखाशिर्षाअंतर्गत मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

| लेखाशिर्ष | (रूपये लक्ष मध्ये) |
|---|---|
| क) **मागणी क्रमांक डी-३,**<br>**२४०१- पीक संवर्धन,**<br>**११४, तेलबियाणे**<br>**(००) (०६) राष्ट्रीय अभियान तेलबिया व तेलताड**<br>**लघु अभियान-१ (तेलबिया) (कें.पु.यो) ( केंद्र हिस्सा ७५ टक्के)**<br>**(२४०१ २४९८) ३३- अर्थसहाय्य,** | **१२०२.०४** |
| ख) **मागणी क्रमांक डी-३ ,**<br>**२४०१,पीक संवर्धन,**<br>**११४ - तेलबियाणे**<br>**(००) (१३ ) राष्ट्रीय तेलबिया आणि तेलताड अभियान**<br>**लघुअभियान-३ (वृक्षआधारित तेलबिया) (डिएसअेओ) (कें.पु.यो)**<br>**(केंद्र हिस्सा ७५ टक्के)**<br>**(२४०१ ९४९२) -३३- अर्थसहाय्य** | **१५.३७** |

४) केंद्र शासनाच्या हिश्श्याच्या अनुषंगाने राज्य शासनाच्या समरूप राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील तरतूदीस प्रशासकीय तसेच वित्तिय मान्यता संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येईल.

५) सदर अभियानाअंतर्गत या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत असलेला ₹ १२१७.४१ लक्ष निधीचा कार्यक्रम सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनार्थ विभागीय कृषी सहसंचालक स्तरावर विभागीय कृषी सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हा स्तरावर जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषी अधिकारी, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६) राष्ट्रीय तेलबिया व तेलताड अभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी, संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घ्यावी:-

I) केंद्र शासनाच्या दि. १५ मे, २०१५ च्या पत्रासोबत जोडलेल्या परिशिष्टान्वये मंजूरी दिलेल्या अनुदानाच्या दराने, तसेच भौतिक व आर्थिक लक्षाकांप्रमाणे बाब निहाय कार्यक्रम राबविण्यात यावा.

II) लाभार्थी निवडताना लहान व सिमांतक शेतकरी, अनुसूचित जाती/जमाती शेतकरी व महिला लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

III) मंजूर निधीपैकी ३० टक्के निधी महिला लाभार्थ्यांसाठी खर्च करण्यात यावा व याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात. अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती यांच्यासाठी निधीचे वाटप करताना त्या- त्या जिल्ह्यात त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात निधीचे वितरण करण्यात यावे, तसेच सदर निधी वितरित केलेल्या घटकांसाठीच वापरण्यात येत आहे, याची दक्षता घेण्यात यावी. अभियानाचा मासिक /तिमाही प्रगती अहवाल केंद्र शासनास सादर करतेवेळी, लाभार्थी लक्षांक साध्यनिहाय बाबतच्या माहितीचा अंतर्भाव करावा.

IV) या अभियानाचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून (Third Party Evaluation) करून घ्यावे.

V) सन २०१४-१५ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये /पंचायत समिती/जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी. तसेच ती यादी विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावी.

VI) ज्या शेतकऱ्यांची उपजिविका केवळ शेतीवरच अवलंबुन आहे, अशाच गरजू शेतकऱ्यांना योजनेचा लाभ अनुज्ञेय राहील.

VII) एकदा योजनेचा लाभ घेतल्यानंतर, त्या लाभार्थ्यांना योजनेंतर्गत बियाणे घटकाव्यतिरिक्त इतर घटकांचा पुनश्च लाभ अनुज्ञेय असणार नाही.

(७) सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे /पक्रियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/ P.W.D. मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार /प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

८) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, व सदर अहवाल केंद्र शासनास सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती शेतकरी व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक/आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळ्याने सादर होईल याबाबत दक्षता घेण्यात यावी.

९) सदर शासन निर्णय वित्त विभागाने संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील दि. १७ एप्रिल, २०१५ च्या परिपत्राकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८१९१४३३३८८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Hoktuji Chawre

Digitally signed by Siddharth Hoktuji Chawre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Hoktuji Chawre
Date: 2015.08.19 14:36:40 +05'30'

**(सिध्दार्थ चवरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त कृषि, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे
३. संचालक ( फलोत्पादन ), कृषि आयुक्तालय, पुणे
४. सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे-१
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. जिल्हाधिकारी, (सर्व)
७. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)

१३.व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे, दुग्ध कॉलनी गोरेगाव (पूर्व), मुंबई-६५
१४.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, शास्त्रीनगर, अकोला.
१५.सहसंचालक लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, पाचवा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ /२, मुंबई / नागपूर
१७.महालेखाकार( स्थानीय निकाय लेखापरिक्षा व लेखा), प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०० ०२०
१८. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१ / कार्यासन - १४४४), मंत्रालय, मुंबई - ३२
१९.वित्त विभाग (व्यय-१) /अर्थसंकल्प -१३
२०.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२१.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई
२२.सर्व सह सचिव / उपसचिव / अवर सचिव, कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन प्रभाग)
२३.मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२४.मा. राज्यमंत्री (कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५.निवडनस्ती